श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी व श्री.ए.एम.शिंदे, समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ यांना बदलीने पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः सकआ -२०१२.क्र.प्र/५३५-आस्था/२**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
दिनांक : ३ सप्टेंबर, २०१४.

## शासन आदेश :-

श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी व श्री.ए.एम.शिंदे, समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ यांना पदोन्नती देताना शासन निर्णय, सा.प्र.वि.दि.८.६.२०१० मधील तरतुदीनुसार त्यांच्याकडून विभागीय संवर्ग वाटपा करता विकल्प मागविण्यात आला होता. श्री.के.जी.बागुल यांनी पदोन्नतीने पदस्थापना करण्याकरिता नाशिक विभागाचा विकल्प दिला होता व श्री.ए.एम.शिंदे यांनी पदोन्नतीने पदस्थापना करण्याकरिता पुणे विभागाचा विकल्प दिला होता.

२. श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी व श्री.ए.एम.शिंदे, समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ यांना त्यांच्या पसंतीनुसार विभागीय संवर्ग वाटप न झाल्यामुळे शासन निर्णय सा.प्र.वि.दि.३१.७.२०१२ मधील तरतुदीनुसार विभागीय संवर्ग बदलून देण्याची विनंती शासनास केली होती. त्यानुसार विभागाने शासन निर्णय सा.प्र.वि.दि.३१.७.२०१२ मधील तरतुदीनुसार श्री.के.जी.बागुल व श्री.ए.एम.शिंदे यांचा विभागीय संवर्ग बदलीचा प्रस्ताव अतिरिक्त मुख्य सचिव (गृह) यांच्या समितीसमोर सादर केला होता. समितीने दि.३.७.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत श्री.के.जी.बागुल यांना नागपूर ऐवजी नाशिक विभाग व श्री.ए.एम.शिंदे यांना अमरावती ऐवजी पुणे विभाग हा विभागीय संवर्ग बदलुन देण्यास मान्यता दिलेली असुन, सदर विभागीय संवर्ग बदलास शासनाची मान्यता प्राप्त झालेली आहे.

त्यानुषंगाने श्री.के.जी.बागुल व श्री.ए.एम.शिंदे यांना त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्रं. ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व पदनाम | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी (शा.नि.शा.) | सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण कार्यालय, नागपूर. | प्रादेशिक उपआयुक्त, समाज कल्याण, नाशिक या कायालयातील समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ या रिक्त पदावर |
| २ | श्री.ए.एम.शिंदे, विशेष अधिकारी (शा.नि.शा.) | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण कार्यालय, अमरावती | सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण, पुणे या कार्यालयातील विशेष अधिकारी (शा.नि.शा.) या रिक्त पदावर |

३. आयुक्त समाज कल्याण, पुणे यांनी श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी व श्री.ए.एम.शिंदे, समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ यांच्याकडील कार्यभार अन्य अधिका-यांकडे सोपवुन त्यांना बदलीच्या पदावर रुजु होण्यासाठी तातडीने कार्यमुक्त करावे.

४. श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी व श्री.ए.एम.शिंदे, समाजकल्याण अधिकारी वर्ग-२ यांनी बदलीने पदस्थापना केलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९०४१२०२५३५३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uttam Shivaram Lonare

Digitally signed by Uttam Shivaram Lonare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uttam Shivaram Lonare
Date: 2014.09.04 11:59:21 +05'30'

**(उ.शि.लोणारे)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

१. श्री.के.जी.बागुल, विशेष अधिकारी, शासकीय निवासी शाळा, सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण कार्यालय, नागपूर.
२. श्री.ए.एम.शिंदे,विशेष अधिकारी,शासकीय निवासी शाळा, सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण कार्यालय, अमरावती

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२. संचालक, विजाभज, संचालनालय, पुणे
३. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, अमरावती/नागपूर/पुणे/नाशिक
४. मा.मंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय
५. मा.राज्यमंत्री (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय
६. सचिव (सा.न्या.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ अमरावती/नागपूर/नाशिक
९. निवडनस्ती आस्था-२.